**समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) कार्यक्रमासाठी पहिल्या हप्त्याचा आवर्ती/अनावर्ती निधी (सर्वसाधारण हिस्सा+SAP) वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१९/प्र.क्र.१११ भाग-१/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २५ ऑक्टोबर, २०१९

**<u>वाचा :-</u>**

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि. १८/०१/२००२

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९

३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : ७-२/२०१९-IS-१२ (GEN), दिनांक २८/०९/२०१९

४) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : ७-२/२०१९-IS-१२ (SAP), दिनांक २८/०९/२०१९

५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप समग्र शिक्षा/लेखा-२/पहिला हप्ता(Gen.,SAP (Gen.), SC, ST) निधी मागणी/२०१९-२०/२८८९, दि.१६/१०/२०१९

**<u>प्रस्तावना:-</u>**

समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २८/०९/२०१९ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनाचा पहिल्या हप्त्याचा आवर्ती / अनावर्ती (सर्व साधारण हिस्सा+SAP) रु.२६०,४५,१७,०००/- (रुपये दोनशे साठ कोटी पंचेचाळीस लाख सतरा हजार फक्त) इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्याचा निधी रु.१७३,६३,४४,६६७/- (रु.एकशे त्र्याहत्तर कोटी त्रेसष्ट लाख चव्वेचाळीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका येतो.

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/अर्थोपाय, दि.२२/१०/२०१९ अन्वये केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुषंगाने निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेला पहिल्या हप्त्याचा (सर्व साधारण हिस्सा+SAP) आवर्ती/अनावर्ती निधी रु.२६०,४५,१७,०००/- (रुपये दोनशे साठ कोटी पंचेचाळीस लाख सतरा हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा निधी (सर्व साधारण+SAP) रु.१७३,६३,४४,६६७/- (रु.एकशे त्र्याहत्तर कोटी त्रेसष्ट लाख चव्वेचाळीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) निधी असा एकूण रुपये रु.४३४,०८,६१,६६७/-(रु.चारशे चौतीस कोटी आठ लाख एकसस्ट हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका (आवर्ती रु.३८०,९४,००,०००/- व अनावर्ती रु.५३,१४,६१,६६७/-) निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकलप संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या (प्राथमिक शिक्षण) अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र.२ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर खर्च, (०१) समग्र शिक्षा अभियान, (०१) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२०२ ।६२१)" | रु.७५० कोटी | रु.२६०,४५,१७,०००/- |
| २ | "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर खर्च, (०१) समग्र शिक्षा अभियान, (०१) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२०२ ।६१२)" | रु.४४६.७९ कोटी | रु.१७३,६३,४४,६६७/- |
| | | **एकूण** | रु.४३४,०८,६१,६६७/- |

२. वित्त विभागाच्या दि.०८/०७/२०१९ रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२८/०९/२०१९ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०१९-२० च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत प्राथमिक शिक्षणाच्या चालु योजनांच्या आवर्ती/अनावर्ती खर्चासाठी खर्च करावा.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०८/०७/२०१९ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०८/०७/२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/अर्थोपाय, दि.२२/१०/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२५१६४५५९४५२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Umeshrao Gaikwad

Digitally signed by Santosh Umeshrao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Santosh Umeshrao Gaikwad
Date: 2019.10.25 16:48:30 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव

३) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (एस.डी.१)